**मुख्यमंत्री जलसंवर्धन योजनेंतर्गत ० ते १०० हे.सिं.क्ष. प्रकल्पांच्या परिरक्षण व दुरुस्ती कामांकरिता निधीचे वितरण-ठाणे मंडळ.**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: दुरुस्ती-२०२५/प्र.क्र.३०८/जल-४**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२५.

**वाचा :- १)** वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४, १२ फेब्रुवारी, २०२५ व १७ मार्च, २०२५
**२)** प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे कार्यालयाचे **"प्रपत्र-अ"** मध्ये नमुद एकूण **०२** प्रस्ताव.

**<u>प्रस्तावना</u> :** ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघुसिंचन (जलसंधारण) प्रकल्पांचे परिरक्षण व दुरुस्ती योजनेकरिता मागणी क्र.झेडएच-५, लेखाशीर्ष ४७०२ ए०४६ खाली सन २०२४-२५ मध्ये रुपये ३००.०० कोटी निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. आता वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकान्वये सुधारित अंदाजानुसार योजनेखाली उपलब्ध झालेल्या निधीमधून ठाणे प्रादेशिक कार्यालयाच्या एकूण ०२ निधी मागणी प्रस्तावांवर खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>निर्णय</u> :** मुख्यमंत्री जलसंवर्धन योजनेंतर्गत हाती घेण्यात आलेल्या **रायगड व रत्नागिरी** जिल्ह्यातील लघुसिंचन (जलसंधारण) प्रकल्पांच्या झालेल्या देखभाल दुरुस्तीच्या एकूण ०२ कामांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी सोबत जोडलेल्या **"प्रपत्र-अ"** प्रमाणे एकूण **<u>रुपये ९३.९१ लक्ष (रुपये त्र्यान्नव लक्ष एक्क्यान्नव हजार फक्त) निधी</u>** वितरित करण्यासाठी याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधी पुढील अटी व शर्तींच्या अधीन वितरित करण्यात येत आहे :-

**अ)** दुरुस्तीचे काम गुणवत्तापुर्वक झाल्याची खातरजमा करुन, देयकाच्या आधारे निधीचे वितरण करण्यात यावे,
**ब)** मंजूर किंमतीपेक्षा जास्तीची रक्कम अदा करण्यात येवू नये,
**क)** कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदरची रक्कम परस्पर अन्य कामासाठी वितरित न करता तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावी,
**ड)** निधी वितरणासंबंधीच्या वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करावे.
**इ)** मुख्यमंत्री जलसंवर्धन योजनेच्या शासन निर्णयान्वये निर्धारित कार्यपध्दती व सुचनांचे अनुपालन करण्यात आले असल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

३. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

४. यावर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक झेडएच-५,

४७०२, लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च
१०१, भूपृष्ठ जल
(०२) परिरक्षण व दुरुस्ती
(०२) (०१) लहान पाटबंधारे योजना
० ते १०० हेक्टर सिंचन क्षमता परिरक्षण व दुरुस्ती (कार्यक्रम) (४७०२ए०४६)
५३, मोठी बांधकामे

५. उपरोक्त खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतीस्वाक्षरीत प्रती तसेच दुरुस्ती पुर्णत्वाचे प्रमाणपत्र शासनाला उपलब्ध करुन द्यावे.

६. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी कार्यालयाची राहिल व अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

७. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेले हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले आहेत. त्यांचा संकेताक २०२५०३३१२११५४८१६२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

RAJESH HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.31 21:17:29 +05'30'

**(रा.हे.बागडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
२. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे.
३. जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, रायगड व रत्नागिरी
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२,नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड व रत्नागिरी
६. कक्ष अधिकारी, कार्यासन जल-११, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती / जल-४.

**प्रत अग्रेषित,**

१. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३. मा. विरोधीपक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे कार्यालय.
४. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फ़त संबधित ल.सिं.(जसं) उपविभागिय अभियंता).
५. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहायक.
६. आयुक्त, मृद व जलसंधारण, छ. संभाजीनगर

| शासन निर्णय क्र. दुरुस्ती-२०२५/प्र.क्र.३०८/जल-४, दिनांक ३१ मार्च, २०२५ सोबतचे "प्रपत्र अ" | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | प्रादेशिक कार्यालय ठाणे | | जिल्हा | कामाचे नाव/संख्या | वितरीत निधी (रुपये लक्ष) |
| | प्रस्ताव क्रमांक | दिनांक | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १६६१ | २६-०९-२०२४ | रायगड | गात पोयनाड | ७०.७० |
| | एकुण रायगड | | | | ७०.७० |
| १ | १७९४ | १४-१०-२०२४ | रत्नागिरी | पा त झर्ये | २३.२१ |
| | एकुण रत्नागिरी | | | | २३.२१ |
| एकुण ठाणे प्रादेशिक विभाग | | | | | ९३.९१ |

RAJESH
HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.31 21:17:53 +05'30'